पंचायत महिला शक्ती अभियान अंतर्गत
राज्य आधार केंद्राची स्थापना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक : पंमअ-१००८/प्र.क्र.११७/पं.रा.-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक - २८ जून, २०१०

वाचा - १) पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांनी दिनांक ७ डिसेंबर, २००७ च्या पत्रान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचना
२) शासन निर्णय क्रमांक :झेडपीए-१००८/प्र.क्र.०२/पं.रा.-१,दिनांक २९ एप्रिल, २०१०

**प्रस्तावना :-**

पंचायत राज संस्थांमधील लोकनियुक्त महिला प्रतिनिधीमध्ये लोकशाही तत्वाविषयी जागृती निर्माण करणे, त्यांना कामकाजाबाबतचे प्रशिक्षण देणे तसेच त्यांच्या समस्या सोडविणे या उद्देशाने पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांनी सन २००७ पासून पंचायत महिला शक्ती अभियान सुरु केले आहे. या अभियानाच्या मार्गदर्शक तत्वानुसार पंचायत राज संस्थांमधील महिला लोकप्रतिनिधींचे सबलीकरण करण्यासाठी राज्य आधार केंद्राची स्थापना (SSC) करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. राज्य आधार केंद्राची स्थापना करण्याबाबत पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

१. राज्य आधार केंद्राची स्थापना नागपूर या ठिकाणी करण्यात येत असून सध्या जिल्हा परिषद कार्यालय नागपूर येथे तात्पूरत्या जागेत हे केंद्र सुरु करण्यात येईल.

२. या केंद्राचे संचालन पंचायत राज संस्थांमधील लोकनियुक्त महिला प्रतिनिधींच्या संघाकडून करण्यात येईल.

३. या केंद्रासाठी नेमण्यात येणारा कर्मचारी वृंद आणि त्यांचे मानधन पुढील प्रमाणे असेल.

| अ. क्र. | पदनाम | पदसंख्या | मानधन/दरमहा (रुपये) | वार्षिक (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | समन्वयक (Gender) | १ | १५,००० | १८०,००० |
| २ | समन्वयक (युवा) | १ | १२,००० | १४४,००० |
| ३ | सहाय्यक | २ | प्रत्येकी रु.८००० | १९२,००० |
| | एकूण | ४ | ४३,००० | ५१६,००० |

C:\Documents and Settings\New user\Desktop\2010GR.lwp

४. या पदासाठीच्या पात्रता पुढील प्रमाणे असतील.

| | | |
|---|---|---|
| अ) | समन्वयक (Gender) | एम. एस. डब्ल्यू./एम. ए. सोशालॉजी व संगणकाचे एमएससीआयटी प्रमाणपत्र प्राप्त (महिला विषयक सामाजिक कामाचा ३ वर्षांचा अनुभव असावा. |
| ब) | समन्वयक (युवा) | एम. एस. डब्ल्यू./एम. ए. सोशालॉजी व संगणकाचे एमएससीआयटी प्रमाणपत्र प्राप्त (युवा विषयक सामाजिक कामाचा ३ वर्षांचा अनुभव असावा) |
| क) | सहाय्यक | डाटा एन्ट्री ऑपरेटर म्हणून काम करण्याची पात्रता असावी. संगणकाचे एमएससीआयटी प्रमाणपत्र प्राप्त तसेच कोणत्याही शाखेचा पदवीधारक असावा. |

५. राज्य आधार केंद्र स्थापन करण्यासाठी अनावर्ती खर्च पुढीलप्रमाणे करण्यात यावा.

| | | |
|---|---|---|
| १) | फॅक्स सुविधा | रु. ३,०००/- |
| २) | फॅक्स मशिन | रु. ५,०००/- |
| ३) | संगणक, इंटरनेट | रु. ५०,०००/- |
| ४) | फर्निचर | रु. १५,०००/- |
| | एकूण | रु. ७३,०००/- |

६. याव्यतिरिक्त इतर खर्चासाठी रु.१८,०००/- दरमहा खर्चाची तरतूद मार्गदर्शक तत्वानुसार करण्यात आली आहे (दरवर्षी रु.२,१६,०००/-)

७. सदर पदे भरण्याची कार्यवाही विभागीय आयुक्त, नागपूर यांचेमार्फत करण्यात येईल. सदर नियुक्त्या तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी पद्धतीने ११ महिन्याच्या कालावधीसाठी असतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००६२८१३३५३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(डॉ. मल्लीनाथ कलशेट्टी )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व).
मा.सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
विभागीय आयुक्त (सर्व).
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

C:\Documents and Settings\New user\Desktop\2010GR.lwp